**को.प.बंधारा तारापूर (सुस्ते), ता.पंढरपूर जि.सोलापूर, या योजनेस देण्यात आलेली प्रशासकीय मान्यता रद्द करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१७/( २८३ /२०१७ )/ लपा-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १४ नोव्हेंबर, २०१९

**संदर्भ:-**

**१) शासन निर्णय क्र.कोपबं ४८७/१२८६/२१८/८७ /लपा१, दिनांक १४/०२/१९८९**
**२) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे जा.क्र.मकृखोविमं-०९/(१०६/२०१७)/प्रशा-७/५१९३, दि.०६/१२/२०१७ चे पत्र.**

**प्रस्तावना:-**

को.प.बंधारा तारापूर (सुस्ते), ता.पंढरपूर जि.सोलापूर, या योजनेस संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये रु. ८७.२४ लक्ष इतक्या किंमतीस मूळ प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. संदर्भाधीन पत्र क्र. २ नुसार महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांच्या नियामक मंडळाच्या ९४ व्या बैठकीत झालेल्या ठराव क्र. ९४/२६ च्या अनुषंगाने को.प.बंधारा तारापूर सुस्ते, ता.पंढरपूर जि.सोलापूर या प्रकल्पाचे सिंचनक्षेत्र प्रशासकीय मान्यतेच्या तुलनेत २० टक्केपेक्षा अधिक कमी होत असून सदर प्रकल्प तांत्रिकदृष्ट्या व आर्थिकदृष्ट्या प्रचलित मापदंडात बसत नसल्याने या योजनेस देण्यात आलेली प्रशासकीय मान्यता रद्द करणेबाबतचा प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

उपरोक्त वस्तुस्थिती विचारात घेता शासनाने आता को.प.बंधारा तारापूर (सुस्ते), ता.पंढरपूर जि.सोलापूर, या योजनेस संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयान्वये दिलेली प्रशासकिय मान्यता या शासन निर्णयाद्वारे रद्द करण्यात येत आहे. या योजनेचे लेखे बंद करण्यात यावे तसेच या प्रशासकिय मान्यतेअंतर्गत यापुढे कुठलाही खर्च करण्यात येवू नये.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१११४१५५७२०४८२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Purnima Devang Desai

Digitally signed by Purnima Devang Desai
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=949e11d9f47452e1756c38e35b6f35f56ed936d055f1ff2c622aef6d98ab6f45, cn=Purnima Devang Desai
Date: 2019.11.14 16:00:15 +05'30'

**(पुर्णिमा देसाई)**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
२. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपुर.

३. वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई ३२
४. नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई ३२.
५. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
६. मुख्य अभियंता(विप्र), जलसंपदा विभाग, पुणे.
७. आंतर वित्त सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. जिल्हाधिकारी, सोलापूर.
९. अधीक्षक अभियंता, भीमा कालवा मंडळ, सोलापूर.
१०. कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग क्र.१, सोलापूर
११. कार्यासन अर्थ, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क, महासंचालक, मंत्रालय, मुंबई.
१३. लपा संग्रहार्थ